भाविकांच्या तरंगत्या लोकसंख्येसाठी हाती घ्यावयाच्या पाणी पुरवठा योजनांसाठी लोकवर्गणीची अट शिथिल करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्र. तीक्षेवि-१००२/प्र.क्र. ६२०/पापु -२२
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :१६ सप्टेंबर , २००२

पहा :-शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग नापापु १०००/प्र.क्र.४१०/पापु २२

प्रस्तावना :-

पाणी पुरवठा योजनांमधे लोकसहभाग असावा या दृष्टीने उपरोक्त दि.१५ जुलै २००० च्या नागरी पाणी पुरवठा योजनांसाठी १० % लोकवर्गणीची अट विहीत करण्यात आली आहे. सदर लोकवर्गणीची अट नव्याने प्रशासकीय मंजुरी द्यावयाच्या योजनांना व ज्या योजनांना प्रशासकीय मंजुरी दिलेली आहे परंतु कार्यान्वियतीचे आदेश दिलेले नाहीत अशा योजनांना लागू करण्यात आलेली आहे. त्या अनुषंगाने नागरी स्थानिक संस्थांनी लोकवर्गणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे भरणे आवश्यक आहे. नागरी पाणी पुरवठा योजनांना लोकवर्गणी लागू असताना राज्यातील प्रमुख तीर्थक्षेत्रांच्या (शेगांव, रामटेक , पंढरपूर, शिर्डी व तुळजापूर) पाणी पुरवठा योजनांना लोकवर्गणीची अट शिथिल करण्याबाबत शासनाकडे निवेदने प्राप्त झाली आहेत.

राज्यातील प्रमुख तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी राहणा-या मूळ नागरिकांबरोबरच दर्शनासाठी बाहेरुन येणा-या भाविकांच्या तरंगत्या लोकसंख्येचासुध्दा विचार करुन पाणीपुरवठा योजना आखाव्या लागतात. तरंगत्या लोकसंख्येचा अंतर्भाव योजनेमधे केल्यामुळे साहजिकच योजनेची किंमत वाढते व सध्याच्या धोरणामुळे लोकवर्गणी भरणे अथवा कर्ज उचलणे व त्याची परतफेड करणे तीर्थक्षेत्रातील स्थानिक स्वराज्य संस्थेस अडचणीचे असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. या बाबीचा विचार करुन शासन खालीलप्रमाणे निर्देश देत आहे.

१. राज्यातील प्रमुख तीर्थक्षेत्रांच्या (शेगांव, रामटेक, पंढरपूर, शिर्डी व तुळजापूर) ठिकाणी येणा-या भाविकांच्या तरंगत्या लोकसंख्येचा अंतर्भाव करुन तयार करण्यात आलेल्या पाणीपुरवठा योजनेच्या एकूण किंमतीपैकी जितक्या खर्चाची कामे तरंगत्या लोकसंख्येसाठी करणे प्रस्तावित असेल अशा योजनेच्या भागाला १० % लोकवर्गणीची अट शिथिल करण्यात येत आहे. तथापी, या तीर्थक्षेत्राच्या मूळ लोकसंख्येसाठी केलेल्या पाणीपुरवठा योजनेस मात्र लोकवर्गणीची अट लागू असेल. अर्थातच,ही सवलत इतर कुठल्याही स्थानिक तीर्थक्षेत्रासाठी लागू होणार नाही.

२. शासनाच्या प्रचलित धोरणानुसार या तीर्थक्षेत्रातील ज्या योजनांना प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे परंतु १० % लोकवर्गणीच्या अटीमुळे व ती लोकवर्गणी संबंधित नागरी स्थानिक संस्थेने न भरल्यामुळे योजनेचे कार्यान्वितयेचे आदेश देण्यात आलेले नाहीत, अशा योजनेच्या बाबतीत तसेच नवीन योजनांच्या बाबतीत मूळ लोकसंख्येसाठी व तरंगत्या लोकसंख्येसाठी अशा दोन भागात योजनेचे अंदाजपत्रक तयार करण्यात यावे. या तीर्थक्षेत्रातील मूळ लोकसंख्येसाठी तयार केलेल्या योजनेच्या भागाच्या किंमतीच्या १०% लोकवर्गणी लागू होणार असल्यामुळे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने अशी विभागणी करुनच अशा योजनांचे प्रशासकीय मान्यतेचे प्रस्ताव सादर करावेत.

३. सध्याच्या प्रचलित धोरणानुसार अशा प्रकारच्या नगरपालिकांवर कशाप्रकारे अतिरिक्त बोजा पडतो आणि या शासन निर्णयामुळे हे प्रस्ताव कशा स्वरुपाचे होणार ते स्पष्ट करणारे उदाहरण सोबतच्या जोडपत्रात देण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

१६. ९. ०२

(बी.सी.खटुआ)

सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. राज्यपालांचे खाजगी सचिव
२. मा.मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव.
३. मा.मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव.
४. मा.राज्यमंत्री, (सर्व) यांचे खाजगी सचिव.
५. सर्व विभागीय आयुक्त.
६. आयुक्त सर्व महानगरपालिका,
७. सर्व जिल्हाधिकारी,
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा.
९. नगरपरिषदांचे अध्यक्ष/मुख्याधिकारी (शेगांव, रामटेक , पंढरपूर व तुळजापूर)
१०. नगरपंचायत, शिर्डी
११. सदस्य सचिव (तांत्रिक/प्रशासन), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
१२. मुख्य अभियंता (सर्व प्रादेशिक विभाग) , महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
१३. महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
१४. महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर
१५. मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१६. उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई/पुणे/अमरावती/नागपूर/नाशिक/औरंगाबाद
१७. संचालक नगरपालिका प्रशासन, मुंबई.
१८. सर्व अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
१९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२०. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
२१. सर्व मंत्रालयीन विभाग.
२२. सर्व कार्यासने (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग )
२३. निवडनस्ती पापु २२

# जोडपत्र

(शा.नि.क्र. तीक्षेवि-१००२/प्र.क्र.६२०/पापु २२ ता.१६ सप्टेंबर २००२)

१. सर्वसाधारण :

१) तीर्थक्षेत्राचे नाव- 'क्ष'

२) नागरी संस्थेचे वर्ग- 'ब' श्रेणी

३) लागू असलेला वित्तीय आकृतिबंध : (सर्वसाधारण धोरणानुसार)

लोकवर्गणी - १०%

शासकीय अनुदान-४०%

कर्ज-५०%

४) उदाहरणार्थ योजनेची किंमत- रु.१०० लाख

पैकी मूळ गावातील लोकसंख्येसाठी - रु.६० लाख

व तरंगती लोकसंख्येसाठी - रु.४० लाख

२. या शासननिर्णयामुळे वित्तीय आकृतिबंधात होणारे बदल :-

(रु.लाखात)

| अ.क्र | बाब | हिस्सा | प्रचलित धोरणानुसार | सुधारित धोरणानुसार | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | मूळ गावासाठी | यात्रेकरुंसाठी | एकूण (५अ+५ब) |
| १ | २ | ३ | ४ | ५ अ | ५ ब | ५ क |
| १ | लोकवर्गणी | १०% | १०.०० | ६.०० | ---- | ६.०० |
| २ | कर्ज | ५०% | ५०.०० | ३०.०० | ---- | ३०.०० |
| ३. | अनुदान | ४०% | ४०.०० | २४.०० | ---- | २४.०० |
| ४. | अनुदान (यात्रेकरुंसाठी) | ----- | ------ | ------- | ४०.०० | ४०.०० |
| | एकूण | १००% | १००.०० | ६०.०० | ४०.०० | १००.०० |

३. अशा प्रकारे, न.पा.वरील बोजा रु.६० लाखावरुन (६०%) रु.३६ लाखावर (३६%) येईल, म्हणजे २४% नी कमी होईल.